**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) सेंद्रिय शेती) सन २०१९-२० अनुसूचित जाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३१९/ प्र.क्र.१४०/१-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२०

वाचा :१) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना.
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशेयो /१२१४प्र.क्र.२६६/१७, दि.२०.०२.२०१६.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.९-३९/२०१५/Org.Fmg, दि.०२ जुन, २०१७.
४ ) केंद्र शासनाचे क्र. २-१/२०१७-Org.Fmg, दि. १८ सप्टेंबर, २०१७ चे तीन पत्र.
५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/प्र.क्र.३३/२०१७-१८/सेंशे/६८०/२०१७, दि.१६.११.२०१७
६) शासन निर्णय क्र. सेंशेयो/१२१७ प्र.क्र .२१०/१७-अे, दि. २४ जानेवारी, २०१७
७) शासन निर्णय शुध्दीपत्रक क्र. सेंशेयो/१२१७ प्र.क्र.२१०/१७-अे, दि. २९ जानेवारी, २०१८
८) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: सेंशेयो-१२१७/ प्र.क्र.२१०/१७अे, दि.१७/०२/२०१८
९) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: पुरक २५१७/ प्र.क्र.२४३/१७अे, दि.२१/०२/२०१८
१०) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: पुरक २५१७/ प्र.क्र.२४२/१७अे, दि.०३/०३/२०१८
११) केंद्र शासनाचे क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(ii), दि. २५ ऑक्टोबर, २०१९
१२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. पकृवियो/नि.उ./प्रक्र ३/ ५४६/२०१९, दि. ०५/११/२०१९
१३) शासन निर्णय क्रमांक : योजना ३३१९/ प्र.क्र. १३९/१-अे , दि. ०३/१२/२०१९

**प्रस्तावना -:**

राज्य शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना ( सेंद्रिय शेती) ही योजना २०१५-१६ पासून केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्याचा निर्णय संदर्भाधिन क्रमांक ०२ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. यामध्ये सध्या ९३२ गटांचा तीन वर्षाचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

नवी दिल्ली येथे दिनांक ११ मे, २०१७ रोजी परंपरागत कृषी विकास योजनेची तिसरी कार्यकारी समितीची बैठक झाली. सदर बैठकीमध्ये केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याकरिता नवीन ३२६ गट मंजूर केलेले आहेत. त्यानुषंगाने राज्य शासनाने अनु.क्र. ६ व ७ येथील शासन निर्णयान्वये ३२६ गटांचा प्रथम वर्षाचा कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

तसेच ३२६ गटांसाठी केंद्र शासनाने व्दितीय वर्षाच्या कार्यक्रमासाठी निधी मंजूर केला आहे. त्यामुळे सदर कार्यक्रम सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी राज्य शासनाने अनु.क्र. १३ येथील शासन निर्णयान्वये ३२६ गटांचा व्दितीय वर्षाचा संपूर्ण कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

संदर्भाधिन क्रमांक ०४ येथील दिनांक १८.०९.२०१७ रोजीच्या तीन पत्रान्वये नवीन ३२६ गटांचा प्रथम वर्षाचा कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१७-१८ साठी केंद्र हिस्सा रू. १३९६.२१ लाख व राज्य हिस्सा रू.९३०.८० लाख असा एकूण रू.२३२७.०१ लाख इतका रकमेचा नियतव्यय मंजूर केलेला होता. त्यानुसार संदर्भ क्र. ८, ९ व १० अन्वये **५० टक्के निधी** खालीलप्रमाणे प्रवर्ग निहाय वितरीत करण्यात आलेला होता.

(रु.लाख)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | ५४४.५२ | ३६३.०१ | ९०७.५३ |
| अनुसूचित जाती | ८३.७७ | ५५.८५ | १३९.६२ |
| अनुसूचित जमाती | ६९.८१ | ४६.५४ | ११६.३५ |
| **एकूण** | **६९८.१०** | **४६५.४०** | **११६३.५०** |

आता, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना राबविण्याकरिता ३२६ गटांकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. १२६.२४४४८ लाख इतक्या निधीस केंद्र शासनाचे संदर्भ क्र. ११ अन्वये मान्यता दिलेली आहे. केंद्र हिश्श्यास अनुसरुन राज्य हिस्सा रु. ८४.१६२९९ लाख असे एकूण रु. २१०.४०७४७ लाख होत असून त्यासाठी आवश्यक असलेली अर्थसंकल्पिय तरतूद सन २०१९-२० मध्ये उपलब्ध आहे. सदर निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना (सेंद्रिय शेती), सन २०१९-२० मध्ये राबविण्याकरिता ३२६ गटांकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याकरिता रू. १२६.२४४४८ लाख व राज्य हिश्श्याकरिता रु. ८४.१६२९९ लाख असा एकूण रु. २१०.४०७४७ लाख इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अनु.क्र. ६, ७ व १३ येथील शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| मागणी क्रमांक -डी-३,<br>२४०१ पिक संवर्धन,<br>(००) ७८९, **अनुसूचित जाती उपयोजना**<br>(००)(२७) कृषि उन्नती योजना-परंपरागत कृषि विकास योजना (केंपुयो),<br>**केंद्र हिस्सा- ६०%**<br>**२४०१ ए७०८,**<br>योजनांतर्गत ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक -डी-३,<br>२४०१ पिक संवर्धन,<br>(००) ७८९, **अनुसूचित जाती उपयोजना**<br>(००)(२८) कृषि उन्नती योजना-परंपरागत कृषि विकास योजना (केंपुयो),<br>**राज्य हिस्सा -४० %**<br>**२४०१ ए७१७,**<br>योजनांतर्गत ३३ अर्थसहाय्य |

उपरोक्त निधीतून प्रथम वर्षातील योजनेचे राबवावयाचे शिल्लक राहिलेले घटक तसेच व्दितीय वर्षातील सर्व घटक राबवावयाचे आहेत.

३. **सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. वरील योजनेचा निधी अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठीच खर्च करण्यात यावा तसेच केंद्र हिश्श्याच्या प्रमाणातच राज्य हिस्सा खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक २२ जानेवारी, २०२० मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

६. सदर योजनेकरीता आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग तीन मधील अनु.क्र.४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५१५१६३९४८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.02.15 15:18:01 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. सचिव (कृषी ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त ( कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) मा. मंत्री (कृषी ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (कृषी ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
६) कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१०) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
११) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१४) नियोजन विभाग-१४३१, मंत्रालय, मुंबई
१५) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती, कार्यासन १-अे.